आस्थापना -पुणे विभाग
**एकूण १०७५ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२३ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ या कालावधी पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इएसटी - २०२२/प्र.क्र.४६/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १३ मार्च, २०२३.

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, संकीर्ण-१००२/प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८, दि.२०/०३/२००६
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: प्राफेब-२०१०/प्र.क्र.-२६/पुनर्बांधणी-३/ म-१०, दिनांक ३०/७/२०१३.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, ईएसटी-२०१७/प्र.क्र.३५/ई-८,दि.२५/०४/२०१७.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.१८/०८/२०२२
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, ईएसटी-२०२२/प्र.क्र.४६/ई-८,दि.०३/१०/२०२२.
६) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०८/०२/२०२३.

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाच्या दिनांक १८/०८/२०२२ च्या शासन निर्णयास अनुसरुन विभागीय आयुक्त, पुणे तसेच जिल्हाधिकारी, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर व कोल्हापूर यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवरील व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयातील आकृतीबंधातील १०७५ अस्थायी पदांना दिनांक ०१/०९/२०२२ ते दिनांक २८/०२/२०२३ या कालावधीसाठी महसूल व वन विभागाच्या संदर्भाधिन दि.०३/१०/२०२२ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दिनांक ०८/०२/२०२३ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२३ ते दि.३१/०८/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन पुणे विभागातील विभागीय आयुक्त व त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांच्या आस्थापनेवरील आकृतीबंधाबाहेरील १०७५ अस्थायी पदांना वरील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

विभागीय आयुक्त, पुणे तसेच जिल्हाधिकारी, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर व कोल्हापूर यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवरील व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयातील आकृतीबंधातील १०७५ पदांना संदर्भाधीन क्र.०३,दि.२५/०४/२०१७ येथील शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रामधील अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च,२०२३ ते दिनांक ३१ ऑगस्ट,२०२३ या कालावधीसाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ०८/०२/२०२३ च्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च संदर्भाधीन क्र.०३ येथील शासन निर्णयासोबतच्या संबंधित विवरण पत्रातील रकाना-क्रमांक ०५ मध्ये दर्शविलेल्या लेखाशीर्षाखालील सन २०२३-२४ साठी मंजूर झालेल्या अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०८/०२/२०२३ च्या शासन निर्णयात दरम्यानच्या काळात सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकीय विभागांनी दक्षता घेण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे. त्यानुषंगाने सदर प्रकरणी उचित कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०८/०२/२०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३१४१५०८१८६११९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dr.SHWETA SAWDEKAR BAIG

Digitally signed by Dr.SHWETA SAWDEKAR BAIG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6281ac1913ceb1456ffcfd8e5d3dbe032cfa746426763d6351cb898b72986801, pseudonym=7EEE8BAF53B2BFC59945DABFC99C96C2C2709F7F, serialNumber=2FA86D3D30D0DE896CC35E8F420B067861B1ECA1D14FF010A5202C61E6ADC6FE, cn=Dr.SHWETA SAWDEKAR BAIG
Date: 2023.03.14 15:12:52 +05'30'

**( डॉ. श्वेता सावदेकर-बेग )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) जिल्हाधिकारी, पुणे/ सातारा/ सांगली/ सोलापूर/ कोल्हापूर
३) अपर जिल्हाधिकारी / उप विभागीय अधिकारी / तहसिलदार ( संबंधित जिल्हाधिकारी यांच्यामार्फत )
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ सातारा/ सांगली/ सोलापूर/ कोल्हापूर.
६) उप सचिव, कार्यासन (आ.पु.क./व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) सह सचिव/ उप सचिव, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.